केंद्र शासन पुरस्कृत "National Programme for Dairy Development (NPDD)कार्यक्रमराज्यात राबविणेबाबत.......

जिल्हास्तरीय अंमलबजावणी व संनियंत्रण समितीचे गठन.

# महाराष्ट्र शासन

## कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग

शासन निर्णय क्रमांकः एमएलके -२०१४/प्र.क्र. ३७/पदुम ८

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२.

तारीख: ४ ऑगस्ट, २०१४

संदर्भ :- १) केंद्र शासनाच्या कृषि विभागाचे पत्र क्र.१-१/२०१२-DP, दि.१५ मे, २०१४.

२) शासन समक्रमांकित दि. ४ ऑगस्ट, २०१४ रोजीचा शासन निर्णय.

**शासन निर्णय**—

केंद्र शासनाने १२ व्या पंचवार्षिक योजनेंतर्गत National Programme for Bovine Breeding and Dairy Development (NPBBDD) हा कार्यक्रम संपूर्ण देशात राबविण्यास संदर्भाधीन क्र. १ पत्रान्वये प्रशासकीय मंजुरी दिली आहे. या कार्यक्रमांतर्गत सन २०१४-२०१५ या कालावधीत केंद्र शासनाने ३०९.०० कोटी निधीची तरतूद केली असून यापैकी रु.१०५.०० कोटी NPDD या कार्यक्रमाच्या वाटपासाठी उपलब्ध आहेत. संदर्भ क्र.२ अन्वये राज्यात दुग्धव्यवसायांतर्गत प्रकल्पांची अंमलबजावणी करण्यासाठी शासनाने महाराष्ट्र राज्य सहकारी दूध महासंघ मर्या., मुंबई या यंत्रणेस **"राज्यस्तरीय दुग्धप्रकल्प अंमलबजावणी यंत्रणा"** म्हणून घोषित केले आहे.

राज्यस्तरीय दुग्धप्रकल्प अंमलबजावणी यंत्रणेमार्फत उपरोक्त कार्यक्रमांतर्गत राबविण्यात येणा-या प्रकल्पांचे जिल्हास्तरावर अंमलबजावणी व संनियंत्रणाकरीता **"जिल्हास्तरीय अंमलबजावणी व संनियंत्रण समिती"** स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन या निर्णयान्वये खालीलप्रमाणे **"जिल्हास्तरीय अंमलबजावणी व संनियंत्रण समिती"** स्थापन करण्यास मान्यता देत आहे.

१) संबंधित जिल्हयाचे जिल्हाधिकारी - अध्यक्ष

२) संबंधित विभागाचे प्रादेशिक दुग्धव्यवसाय विकास अधिकारी - सदस्य

३) संबंधित जिल्हयाचे जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी - सदस्य

४) संबंधित जिल्हा / तालुका दूध संघाचा प्रतिनिधी - सदस्य

५) संबंधित जिल्हयाचे जिल्हा दुग्धव्यवसाय विकास अधिकारी -सदस्य सचिव

**समितीची कार्यकक्षा :**

सदर समिती, राष्ट्रीय दुग्धविकास कार्यक्रमांतर्गत (NPDD) त्या - त्या जिल्हयात / तालुक्यात राबविण्यात येणा-या दुग्धप्रकल्पांच्या सुयोग्य अंमलबजावणीचे व संनियंत्रणाचे कार्य करील. समिती प्रत्येक बैठकीअंतीचा अहवाल "राज्यस्तरीय दुग्धप्रकल्प अंमलबजावणी यंत्रणा" समितीस सादर करील. समितीची बैठक २ महिन्यातून एकदा आयोजित करण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८०४१७२३५१२४०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sathe Shashank M

Digitally signed by Sathe Shashank M
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Agri & ADF, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sathe Shashank M
Date: 2014.08.04 17:22:00 +05'30'

( श. मा. साठे )

उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति ,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव

२) मा. उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव

३) मा. मंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव

४) मा. राज्यमंत्री (दुग्धव्यवसाय) यांचे खाजगी सचिव

५) आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे १.

६) आयुक्त दुग्धव्यवसाय विकास ,महाराष्ट्र राज्य,वरळी, मुंबई १८.

७) व्यवस्थापकीय संचालक,महाराष्ट्र राज्य सहकारी दूध महासंघ मर्या., गोरेगाव (पू.) मुंबई ६५.

८) सर्व प्रादेशिक दुग्धव्यवसाय विकास अधिकारी,

९) सर्व जिल्हा दुग्धव्यवसाय विकास अधिकारी,

१०) निवड नस्ती